शासकीय सेवेतील विवाहीत महिला
कर्मचा-यांच्या बदल्या - सर्वसाधारण तत्वे.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक: एसआरव्ही-१०८७/सीआर-४९/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १४ मार्च १९८८.

पहा :- [१] एसआरव्ही-१०७२-डी, दिनांक १५ जुलै १९७२.
[२] एसआरव्ही-१०७२-डी, दिनांक ३० नोव्हेंबर १९७२.
[३] एसआरव्ही-१०७४-डी, दिनांक २१ सप्टेंबर १९७४.
[४] एसआरव्ही-१०७४-डी, दिनांक ४ मार्च १९७५.

शासन परिपत्रक :- विवाहीत महिला कर्मचा-यांच्या बदल्या करताना काही सर्वसाधारण तत्वे विहित करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासकीय कार्यालये व संबंधित कर्मचारी यांच्या मार्गदर्शनासाठी पुढे दर्शविलेली सर्वसाधारण तत्वे विहित करण्यात येत आहेत :-

१. कोणत्याही परिस्थितीमध्ये विवाहीत महिला कर्मचा-यांची बदलीची विनंती शासकीय सेवेची निकड/रिक्त पदे आणि सार्वजनिक सेवेचे हित लक्षात घेऊनच मान्य करण्यात यावी.

२. बदली समकक्ष पदावरच होऊ शकते. परंतु काही अपवादात्मक प्रकरणात योग्य व समर्थनीय कारणांसाठी समकक्ष नसलेल्या कनिष्ठ पदावरही बदलीचा विचार करता येईल.

३. बदलीची विनंती करणा-या महिला कर्मचा-यांची नियुक्ती नियमित स्वरुपात असावी.

४. बदलीनंतरच्या कार्यालयात ज्येष्ठतेसाठी मागील सेवेचा फायदा त्यांना शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-१०७४-डी, दिनांक २१ सप्टेंबर १९७४ मधील तरतुदींच्या अधिन राहूनच मिळेल.

५. पूर्वीच्या सेवेचा फायदा, निवृत्तीवेतन, रजा, बदलीच्या कार्यालयातील पदावर वेतननिश्चिती आणि वेतनवाढी यासाठी महाराष्ट्र नागरी सेवा नियमातील विविध तरतुदींच्या अधीन राहून देण्यात यावा.

६. बदलीच्या कार्यालयात विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे बंधनकारक राहील.

७. विवाहीत महिला कर्मचारी कायम असल्यास किंवा तिला कायमपणाचे प्रमाणपत्र मिळाले असेल तर बदलीनंतरच्या पदावर कायम होईपर्यंत किंवा त्यावर कायमपणाचे प्रमाणपत्र मिळेपर्यंत बदली पूर्वीच्या पदावरील त्यांचा धारणाधिकार राहील.

कृ. मा. प.

८. बदलीच्या ठिकाणी जाण्यासाठी होणारा प्रवासखर्च, तसेच नवीन कार्यालयात रुजू होण्यासाठी पदग्रहण अवधी मिळणार नाही.

९. विवाहीत महिला कर्मचा-यांच्या त्यांच्या संपूर्ण सेवेच्या कालावधीत फक्त दोन वेळा अशाप्रकारे बदली करण्यास अनुमती देण्यात येईल.

१०. संबंधित विवाहीत महिला कर्मचा-यांची बदली होण्यापूर्वी त्यांनी वरील अटी मान्य असल्याबाबत स्पष्ट लेखी कबुली दिलेली असावी.

११. बृहन्मुंबईतील कार्यालयात बदलीने नेमणूक करण्यापूर्वी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची सहमती घेणे आवश्यक राहील.

सदरहू परिपत्रक, निर्गमित झालेल्या दिनांकापासून या अटी अंमलात येतील. या अटींचा फायदा यापूर्वी बदली झालेल्या विवाहीत महिला कर्मचा-यांना लागू होणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

र. शां. दिक्षित,
उप सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय [पत्राने],
प्रबंधक, उच्च न्यायालय, [अपील शाखा], [पत्राने],
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग.

***********